परदेशातून आयात केलेले फटाके व त्यांच्या विक्रीस प्रतिबंध करण्यासाठी करावयाच्या उपाययोजनांबाबत.

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
## शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण १०२०/सी-१८६/पोल-९

हतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: ०६ नोव्हेंबर, २०२०

## परिपत्रक

**वाचा :-**

१) केंद्र शासनाच्या वाणिज्य व उद्योग मंत्रालयाचे क्र. ०१/८९/Moni-५८५१/AM-०३/PC-२(A)/e-१२५९, दिनांक १३.१०.२०२० चे पत्र.

**प्रस्तावना :-**

फटाके हा विषय Indian Trade Classfication (Harmonized System) Code ३६०४१०० अंतर्गत येतो. परदेशातील फटाक्यांच्या आयातीस केंद्र शासनाने प्रतिबंध घातलेला आहे. Director General of Foreign Trade (DGFT) यांच्या परवान्याशिवाय विदेशी फटाक्यांची आयात करता येत नाही. तसेच, बऱ्याच वर्षापासून DGFT यांनी विदेशी फटाक्यांच्या आयातीस परवानगी दिलेली नसल्यामुळे विदेशी फटाक्यांची कोणत्याही देशातून आयात झालेली नाही, असे Trade data वरुन दिसून येत असल्याचे केंद्र शासनाने त्यांच्या पत्रात नमूद केले आहे, असे असतांना देशांतर्गत बाजारात विदेशी फटाक्यांची विक्री होत असल्याच्या घटना निदर्शनास आल्या असल्याचे केंद्र शासनाने कळविले आहे. याचाच अर्थ विदेशी फटाक्यांच्या आयातीवर प्रतिबंध असतांना देखील परदेशातून अवैध मार्गाने विदेशी फटाके देशांतर्गत बाजारात आणले जात आहेत. यास्तव, केंद्र शासनाच्या वाणिज्य व उद्योग मंत्रालयाने अनधिकृतपणे विदेशातून आयात केलेले फटाक्यांची साठवणूक, विक्रीस प्रतिबंध करण्यासाठी करावयाच्या कार्यपध्दतीबाबत सूचना दिलेल्या आहेत. त्याच प्रमाणे याबाबत सचिव, वाणिज्य व उद्योग मंत्रालय, नवी दिल्ली यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक १६.१०.२०२० रोजी व्हिडिओ कॉन्फरन्सिंगव्दारे बैठक अयोजित करण्यात आली होती. या बैठकीमध्ये सचिव, वाणिज्य व उद्योग मंत्रालय, नवी दिल्ली यांनी आगामी दिपावली सणाच्या पार्श्वभूमीवर विदेशातून अनधिकृतपणे आयात केलेले फटाक्यांची साठवणूक आणि विक्रिस प्रतिबंध करण्याकरीता राज्याचे पोलीस महासंचालक, सर्व जिल्हाधिकारी, महानगर पालिका आयुक्त, पोलीस आयुक्त, पोलीस अधिक्षक व इतर यंत्रणा यांना निर्देश देण्याबाबत राज्य शासनास सूचना दिलेल्या आहेत.

## शासन परिपत्रक :-

आगामी दिपावली सणाच्या पार्श्वभूमीवर विदेशातून अनधिकृतपणे आयात केलेले फटाक्यांची साठवणूक व विक्रीस प्रतिबंध करण्याकरीता राज्याचे पोलीस महासंचालक, सर्व जिल्हाधिकारी, महानगर पालिका आयुक्त, पोलीस आयुक्त, पोलीस अधिक्षक व इतर यंत्रणा ज्या फटाके विक्रीला परवानगी देतात अशा सर्व यंत्रणांनी करावयाच्या कार्यवाहीबाबत सुसुत्रता व निश्चित कार्यपध्दती असणे आवश्यक असल्याने प्रस्तुत प्रकरणी उपरोक्त नमूद यंत्रणांना खालीलप्रमाणे उपाययोजना करणेबाबत सूचना देण्यात येत आहेत.

१. विदेशी फटाक्यांची साठवणूक, विक्री व वितरण होणार नाही याकरिता संबंधित यंत्रणांनी सतर्क रहावे. त्याचप्रमाणे नियमित तपासणी करावी.

२. विदेशी फटाक्यांची साठवणूक, विक्री व वितरण होत असल्याच्या बाबी निदर्शनास आल्यास, त्याबाबत कठोर कारवाई करण्यात यावी.

३. सर्व फटाका आस्थापनांची सर्व समावेशक तपासणी करुन प्रतिबंधात्मक उपायोजना कराव्यात, जेणे करुन विदेशी फटाक्यांची साठवणूक आणि विक्री होणार नाही.

४. राज्याचे पोलीस महासंचालक, सर्व जिल्हाधिकारी, महानगर पालिका आयुक्त, पोलीस आयुक्त, पोलीस अधिक्षक यांनी त्यांच्या कार्यक्षेत्रात पत्रकार परिषद तसेच, व्हिडिओ कॉन्फरन्सिंगव्दारे चर्चा करुन आवश्यक त्या कठोर उपाययोजना कराव्यात.

५. वरील विषयाबाबत मा. सर्वोच्च न्यायालयाने रिट पिटिशन (सिव्हिल) क्र. ७२८/२०१५ मध्ये दिनांक २३.१०.२०१८ व दिनांक ३१.१०.२०१८ रोजी दिलेल्या मार्गदर्शक सूचना जनतेच्या निदर्शनास आणण्यासाठी प्रमुख वृत्तपत्रात दर्शनी भागत जाहिरात करण्यात यावी.

६. सर्व इ-कॉमर्स कंपनी व स्थानिक विक्रेते यांच्या मार्फत विदेशातून अनधिकृतपणे आयात केलेल्या फटाक्यांची तसेच, स्थानिक पातळीवर अनधिकृतपणे उत्पादित केलेल्या फटाक्यांची विक्री होणार नाही यांची दक्षता घ्यावी.

७. राज्याचे पोलीस महासंचालक, सर्व जिल्हाधिकारी, महानगर पालिका आयुक्त, पोलीस आयुक्त, पोलीस अधिक्षक व इतर यंत्रणा यांनी अनधिकृत फटाक्यांचे दुष्परिणाम या विषयाच्या अनुषंगाने जनजागृती करण्याकरीता त्यांच्या कार्यक्षेत्रात पत्रकार परिषदा आयोजित करुन सर्वांना मार्गदर्शन करावे व सदर कार्यात लोकसहभाग वाढविण्याकरीता जनजागृती करावी.

८. विदेशातून अनधिकृतपणे आयात केलेले आणि स्थानिक पातळीवर अनधिकृतपणे उत्पादित केलेले फटाके जवळ बाळगणे, त्यांच्या साठा करणे आणि त्यांची विक्री करणे कायद्यानुसार अवैध

आणि दंडनीय असल्यामुळे विदेशातून अनधिकृतपणे आयात केलेले आणि स्थानिक पातळीवर अनधिकृतपणे उत्पादित केलेले फटाके जर कोणी जवळ बाळगत असेल, त्याचा साठा करत असेल किंवा त्यांची विक्री करत असेल, अशी बाब जनतेच्या निदर्शनास आल्यास जनतेने स्वयंप्रेरणेने त्यांच्या क्षेत्रातील नजीकच्या पोलीस ठाण्यात याबाबत तक्रार करावी, अशा प्रकारची जनजागृती स्थानिक वृत्तपत्रांच्या माध्यमातून करावी

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२०११०६१६४२१३६१२९ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prashant Ramrao Holkar

Digitally signed by Prashant Ramrao Holkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1ff9841059599152cc573e0f8efc8c9804259607ac2918e3ab9808923e3484f2, serialNumber=dadbd8e518b1e28b76734dc10fd968076572066cb8e4377925d2566f380fc12e, cn=Prashant Ramrao Holkar
Date: 2020.11.06 16:43:22 +05'30'

**( प्रशांत होळकर )**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. गृह मंत्री यांचे खाजगी सचिव
४. मा. राज्यमंत्री, गृह(ग्रामीण) यांचे खाजगी सचिव
५. मा. राज्यमंत्री गृह (शहरे) यांचे खाजगी सचिव
६. अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग मंत्रालय, मुंबई
७. प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग मंत्रालय, मुंबई
८. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई
९. महानगर पालिका आयुक्त, महानगर पालिका(सर्व)
१०. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
११. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१२. जिल्हादंडाधिकारी (सर्व)
१३. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई
१४. पोलीस आयुक्त (सर्व)
१५. पोलीस अधिक्षक (सर्व)
१६. सह सचिव (पोल-९) यांचे स्विय सहायक
१७. निवड नस्ती (पोल-९).